**मुटाटकर समिती तथा राज्य मागासवर्ग आयोग यांनी त्यांच्या १ ते ७ अहवालात सन १९९३ ते २००० पर्यन्त शासनास सादर केलेल्या विमुक्त जाती, भटक्या जमाती, प्रवर्गाबाबतच्या शिफारशींची अंमलबजावणी- कार्यवाही महाराष्ट्रातील विमुक्त जाती, भटक्या जमातीच्या यादीत सुधारणा .**

**महाराष्ट्र शासन**

विमुक्त जाती,भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि
विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग,
शासन निर्णय क्रमांकः सीबीसी.१०९८/प्र.क्र.१८५/इमाव-५,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई:४०० ०३२,
दिनांकः १४ फेबुवारी, २००१

**वाचा** १.शासन निर्णय, शिक्षण व समाजकल्याण विभाग, क्रमांक सीबीसी.१३६१/म, दिनांक २१ नोव्हेंबर, १९६१

२.शासन निर्णय, शिक्षण व समाजकल्याण विभाग, क्रमांक सीबीसी.१४६४/१४६६९१/म, दिनांक १८ फेब्रुवारी १९६५,

३.शासन निर्णय, शिक्षण व समाजकल्याण विभाग, क्रमांक सीबीसी.१०६४/२३३६५/म, दिनांक २७ मार्च १९६५,

४.शासन निर्णय, शिक्षण व समाजकल्याण विभाग, क्रमांक सीबीसी. १४६४/९३३४३/म, दिनांक १३ ऑगस्ट १९६५,

५.शासन निर्णय, शिक्षण व समाजकल्याण विभाग, क्रमांक सीबीसी.१४६५/१५१००५/म, दिनांक २१ मे १९६६,

६.शासन परिपत्रक, शिक्षण क्रीडा व समाज कल्याण विभाग क्रमांक. सीबीसी-१४७०/१०२६९-ज, दिनांक १४ ऑगस्ट, १९७०

७.शासन परिपत्रक, समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक सीबीसी.१०७३/१०६१५/ज-१, दिनांक २९ मे १९७४,

८.शासन शुध्दिपत्रक,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक सीबीसी.१०७३/१०६१५/ज-१, दिनांक ७ जून १९७४,

९.शासन परिपत्रक,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक सीबीसी.१०७३/१०६१५/ज -१, दिनांक २२ ऑगस्ट १९७४,

१०.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक सीबीसी.१०७३/१०६१५/ज-१, दिनांक २४ ऑक्टोबर १९७४,

११.शासन परिपत्रक,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक सीबीसी.१४७०/१३५१२/डेस्क-५, दिनांक १८ ऑगस्ट १९७७,

१२.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक सीबीसी.१४७५/२७२/का-५, दिनांक ९ डिसेंबर १९७७,
१३.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक सीबीसी.१४७७/४०९५०/का-५, दिनांक १३ डिसेंबर १९७७,
१४.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक : सीबीसी.१४७७/५८४६३/का-५, दिनांक २० मार्च १९७८,
१५.शासन शुध्दिपत्रक, समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक सीबीसी.१४७५/२७२/का-५, दिनांक १० एप्रिल १९७८,
१६.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक सीबीसी.१४७८/४१०७९/-५, दिनांक २९ नोव्हेंबर १९७८,
१७.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक सीबीसी.१४७९/६६/का-५, दिनांक १२ जुलै १९७९,
१८.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक सीबीसी.१४७९/६६/का-५, दिनांक ४ सप्टेंबर १९७९,
१९. शासन पत्र क्रमांक समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक सीबीसी-१४८४/६६३०९/(१९८३)/बीसीडब्ल्यू-५,
दिनांक २७ सप्टेंबर, १९८५.
२०.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक सीबीसी.१६८२/६५१७८/(११७४)मावक-५, दिनांक, ३१ मार्च १९८७,
२१.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक सीबीसी.१०८५(२०३)/मावक-५, दिनांक २५ मे १९९०,
२२.शासन परिपत्रक,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक सीबीसी.१०९१/(९)/मावक-५, दिनांक ८ फेब्रुवारी १९९१,
२३.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक सीबीसी.१२९१/२२२/मावक-५, दिनांक ३१ जुलै १९९२
२४.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक सीबीसी.१०८९/(२०३)/मावक-५, दिनांक ६ ऑगस्ट १९९२,
२५.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक सीबीसी.१०९१/३०५/मावक-५, दिनांक १८ जानेवारी १९९३,
२६.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
क्रमांक सीबीसी.१०९३/७४९२/प्र.क्र.२८/मावक-५, दिनांक १५ मार्च, १९९३,
२७.भारत सरकार, कार्मिक व प्रशिक्षण मंत्रालय,पत्र
क्रमांक ३६०१२/२२/९३/ईएसटी(एससीटी) दिनांक ८ सप्टेंबर १९९३,
२८.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
क्रमांक सीबीसी.१०९३/७४९२/प्र.क्र.२८/मावक-५, दिनांक १९ मे, १९९५.
२९.भारत सरकार, कार्मिक व प्रशिक्षण मंत्रालय,पत्र
क्रमांक ३६०१२/२२/९३/ईएसटी(एससीटी)

दिनांक २२ ऑक्टोबर १९९३ व दि. १५ नोव्हेंबर,१९९३
३०.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य,क्रीडा विभाग,
क्रमांक सीबीसी.१२९१/(२२२)/मावक-५, दिनांक २३ मार्च १९९४,
३१.शासन शुध्दिपत्रक,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
क्रमांक सीबीसी.१०९३/७४९२/प्र.क्र.२८/मावक-५, दिनांक २७ सप्टेंबर १९९३,
३२.शासन निर्णय,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
क्रमांक सीबीसी.१०९३/७४९२/प्र.क्र.२८/मावक-५, दिनांक ९ ऑगस्ट १९९५,
३३.शासन शुध्दिपत्रक,समाजकल्याण सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
क्रमांक सीबीसी.१०९३/७४९२/प्र.क्र.२८/मावक-५, दिनांक ९ मे १९९७,

**प्रस्तावनाः-**

ब्रिटिश राजवटीमध्ये सन १९२४ गुन्हेगारी कायद्यांतर्गत ज्या जमातींची नोंद होती वज्यांना पुनर्वसन वसाहतीमध्ये ठेवण्यात आले होते अशा पुनर्वसन वसाहती ( सेटलमेंट) स्वातंत्र्यप्राप्तीनंतर नाहीशा करण्यात आल्या व अशा वसाहतींमध्ये राहत असलेल्या नागरिकांना त्यांच्या प्रगतीसाठी काही सवलती जाहीर करण्याचे निश्‍चित करण्यात आले. अशा जाती-जमातींबाबत महाराष्ट्रात प्रथमच दिनांक १४ मे १९५४ च्या आदेशाअन्वये एकूण ४०जाती विमुक्त जाती म्हणून जाहीर करण्यात आल्या व ७ डिसेंबर १९५६ च्या आदेशाअन्वये २७ जाती भटक्या जमाती म्हणून जाहीर करण्यात आल्या. त्यानंतर या जातींचा अभ्यास करण्यासाठी थाडे कमिशनची नियुक्ती सन १९५९ मध्ये करण्यात आली. त्या आधारे विमुक्त जाती आणि भटक्या जमाती यांची एकत्रित संयुक्त यादी त्यासाठी " विमुक्त जाती व भटक्या जमाती" असा प्रवर्ग निर्माण करुन दिनांक २१ नोव्हेंबर १९६१च्या शासन निर्णयाअन्वये जाहीर करण्यात आली. त्यानंतर त्यामध्ये संदर्भाधीन शासन निर्णयान्वये वेळोवेळी सुधारणा करण्यात आली आहे. मंडल आयोगाच्या शिफारशी राज्य शासनाने स्वीकारल्या आहेत. त्यावेळी सन १९९०-९१ मध्ये मंडल आयोगाच्या केंद्र शासनाच्या आदेशावर सर्वोच्च न्यायालयात काही याचिका दाखल झाल्या. त्या सर्व याचिकांचा एकत्रित विचार करुन मुख्य याचिका क्रमांक ९३०/९० इंदिरा सहानी आणि इतर ..विरुध्द... भारत सरकार व इतर यामध्ये दिनांक १६ नोव्हेंबर १९९२ रोजी निकाल देऊन सर्वोच्य न्यायालयाने त्यामध्ये काही निदेश दिले सर्वोच्च न्यायालयाच्या निदेशानुसार दिनांक १९ मे १९९५ च्या शासन निर्णयाअन्वये राज्य मागासवर्ग आयोगाची स्थापना करण्यात आली. एखा'द्या जातीच्या मागणीनुसार व त्याबद्दल आलेल्या तक्रारीनुसार तपासणी करुन एखादी विशिष्ट जात इतर मागासवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग यामध्ये समाविष्ट करावी किंवा कसे आणि अन्यथा अशीच समाविष्ट असलेली जात वगळावी किंवा कसे ही बाब त्याबाबतची मागणी व तक्रार तपासून राज्य शासनास शिफारस करण्याचे कार्य या राज्य मागासवर्ग आयोगाकडे सोपविण्यात आले.

२. राज्य मागासवर्ग आयोगाने सन १९९३ ते २००० या कालावधीत या मागण्यांची तपासणी करुन विमुक्त जाती/भटक्या जमाती प्रवर्गात समाविष्ट करण्याची तसचे इतर मागास वर्गात समाविष्ट करण्याची मागणी असलेल्या एकूण २२६ जातींबाबतचे ७ अहवाल शासनास सादर केले आहेत. सदरच्या अहवालांमध्ये इतर मागासवर्ग प्रवर्ग म्हणून समाविष्ट करावे. तसेच विमुक्त जाती/भटक्या जमाती प्रवर्गात समाविष्ट करावे अशी शिफारस असलेल्या जातींच्या शिफारशींची तपासणी करुन त्यावर निर्णय घेण्याची बाब बऱ्याच कालावधीपासून शासनाच्या विचाराधीन होती. त्यावर विचार करुन इतर

मागासवर्गात समाविष्ट करावयाच्या  जातींबाबत स्वतंत्रपणे शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. विमुक्त जाती/भटक्या जमातीच्या जातीबाबत आता शासनाद्वारे खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**<u>शासन निर्णय:-</u>**

१) मुटाटकर समिती तथा राज्य मागासवर्ग आयोग ( खत्री कमिशन ) यांनी त्यांच्या १ ते ७ अहवालानुसार (१९९३-२००० पर्यन्त) शासनास सादर केलेल्या २२६ जातींच्या शिफारशींपैकी विमुक्त जाती आणि भटक्या जमाती प्रवर्गात समाविष्ट करावे अशी शिफारस असलेल्या १७ जातींचा राज्य शासनाच्या विमुक्त जाती व भटक्या जमातींच्या यादीत नव्याने समावेश करण्यासाठी शासनाकडून  मान्यता देण्यात येत आहे.

२)वरीलप्रमाणे विमुक्त जाती व भटक्या जमातींमध्ये नव्याने समावेश करताना ज्या जातींबाबत यापूर्वीच्या राज्याच्या विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या यादीत समाविष्ट असलेल्या जातींसमोर त्या जातीची तत्सम जात म्हणून समाविष्ट करण्याची शिफारस आहे. ती जात त्या मूळ जातीच्या  अनुक्रमांकासमोर त्या मूळ जातीची तत्सम जात म्हणून दर्शविण्यात आली आहे.

३)ज्या जातीबाबत त्या जातीचा नव्याने समावेश करावा अशी शिफारस आहे, अशा जाती राज्याच्या विमुक्त जाती, भटक्या जमातीच्या यादीमधील शेवटच्या अनुक्रमांकानंतर क्रमवार पुढे दर्शविण्यात आल्या आहेत.

४) वरील निकषानुसार राज्याच्या विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या यादीमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे :-

| अनुक्रमांक | विमुक्त जाती व भटक्या जमातीमधील मूळ जात व त्याचा अनुक्रमांक | नव्याने समाविष्ट करावयाची तत्सम जात व मूळ जातीचा अनुक्रमांक |
|---|---|---|
| १ | भटक्या जमाती ३<br>भराडी (ड)नाथजोगी | भटक्या जमाती ३<br>(ड) नाथजोगी, गारपगारी |
| २ | भटक्या जमाती ७<br>गारुडी | भटक्या जमाती ७<br>सापगारुडी (मुस्लीम धर्मियांसह) |
| ३ | भटक्या जमाती १३<br>जोशी  (इ)सरोदे | भटक्या जमाती १३<br>(इ) सरोदे, सरोदी |
| ४ | भटक्या जमाती २९<br>धनगर | भटक्या जमाती, २९<br>(२२)गडारिया<br>(२३) गड्री<br>(२४)गढरी<br>(२५)डंगेधनगर व डोंगरी धनगर |
| ५ | विमुक्त जाती  ३<br>भामटा | विमुक्त जाती  - ३<br>(ग)घंटीचोर |

| | | |
|---|---|---|
| | | |
| ६ | विमुक्त जाती - १२<br>वडार | विमुक्त जाती - १२<br>(ई)वड्डुर |
| ७ | भटक्या जमाती २६<br>बहुरुपी | भटक्या जमाती - २६<br>(अ)बोहरशी<br>(ब)बहुरुपिया<br>(क)भोरपी<br>(ड)रायरंध्र<br>(इ)अय्यार व अय्यारी |
| ८ | भटक्या जमाती - २१<br>सिक्कलगार | भटक्या जमाती - २१<br>सेक्वलगर( मुस्लिम धर्मिय)<br>शिख-शिकलीगार<br>शिख- शिकलीकर |
| ९ | भटक्या जमाती - २<br>बेलदार | भटक्या जमाती - २<br>ओड, मुस्लीम बेलदार |
| १० | भटक्या जमाती - २८<br>ओतारी | भटक्या जमाती -२८<br>(इ) वतकर, वतकरी<br>वतनकर, वतोकर<br>ओतकरी, ओतोकार |
| ११ | भटक्या जमाती - ३<br>भराडी | भटक्या जमाती - ३<br>(ई) नाथ, जोगी, नाथपंथी |

५. पुढील जाती नव्यानेच राज्याच्या भटक्या जमातीच्या यादीत समाविष्ट करण्यात येत असून त्यांचा समावेश मूळ यादीतील अनुक्रमांक ३० नंतर क्रमवार पुढे दर्शविण्यात येत आहे.

| अनुक्रमांक | जातीचे नाव |
|---|---|
| ३१ | मरीआईवाले,कडकलक्ष्मीवाले, मरगम्मावाले |
| ३२ | गिहरा/गहरा |
| ३३ | गुसाई/गोसाई |
| ३४ | मुस्लीम मदारी,गारुडी, सापवाले व जादूगर |
| ३५ | भारतीय इराणी |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( अशोक खोत )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
मुख्य महानगर दंडाधिकारी,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हा दंडाधिकारी,
सर्व उप विभागीय अधिकारी ( महसूल)
तथा उप विभागीय दंडाधिकारी,
सर्व तालुका कार्यकारी दंडाधिकारी तथा तहसिलदार,
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा खंडपीठ - नागपूर,
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा खंडपीठ - नागपूर,
प्रबंधंक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा खंडपीठ- औरंगाबाद,
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा खंडपीठ - औरंगाबाद,
संचालक समाजकल्याण/विमुक्त जाती, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, उच्च व तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
संचालक, माध्यमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, प्राथमिक शिक्षण ,महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
सदस्य सचिव, राज्य मागासवर्ग आयोग, पुणे,
सर्व मंत्रालयीन विभाग,

**त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांना हयाबाबतच्या सूचना द्याव्यात.**

सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी/ सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे समाजकल्याण अधिकारी,
जिल्हा समाजकल्याण अधिकारी, बृहन्मुंबई/ मुंबई उपनगरे ,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
सर्व कक्ष अधिकारी, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागासप्रवर्ग कल्याण विभाग , मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती/ इमाव -५, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागासप्रवर्ग कल्याण विभाग , मंत्रालय, मुंबई.